**श्री शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी, जि.सोलापूर संचलित भारत विद्यालय, उस्मानाबाद तालिम गल्ली, खाजा नगर, ता.जि.उस्मानाबाद या शाळेचे सर्व्हे नं.३५०/१, नारायण बाग, शासकीय तंत्र प्रशालेच्या पाठीमागे, ता.जि.उस्मानाबाद येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३१८/प्र.क्र.४२५/एसएम-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १४ ऑगस्ट, २०१८

**वाचा :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/(५९/१२)माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.

**संदर्भ :-** विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर यांचे क्र.शिउस/ला/मावि-२/२०१७-१८/ ३४४०/४३, दिनांक २२ मार्च, २०१८ चे पत्र

**प्रस्तावना :-**

श्री शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी, जि.सोलापूर संचलित भारत विद्यालय, उस्मानाबाद तालिम गल्ली, खाजा नगर, ता.जि.उस्मानाबाद या मराठी माध्यमाच्या अनुदानित उच्च प्राथमिक व माध्यमिक शाळेचे, सर्व्हे नं.३५०/१, नारायण बाग, शासकीय तंत्र प्रशालेच्या पाठीमागे, ता.जि.उस्मानाबाद येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेचे अपुऱ्या भौतिक सुविधा असलेल्या सध्याच्या इमारतीतून मालकीच्या नवीन प्रशस्त इमारतीत स्थलांतर प्रस्तावित आहे. सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे :-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) इयत्ता १० वी च्या वर्गास मान्यता दिली असल्याबाबत खात्री करण्यात यावी.

(३) शाळेतील विद्यार्थ्यांच्या सर्व पालकांची स्थलांतरास संमती असल्याबाबत खात्री करण्यात यावी.

(४) शाळेतील सध्याच्या विद्यार्थ्यांचे स्थलांतराच्या ठिकाणी समायोजन करण्यात यावे.

(५) स्थलांतरास सर्व शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी यांची सहमती असावी. तसेच सर्व पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना स्थलांतरित ठिकाणी सामावून घेण्यात येईल व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल होणार नाही याबाबत संस्थेच्या अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(६) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नुसार व शासनाकडून याबाबत वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार शाळेसाठी पक्की इमारत व सर्व भौतिक सुविधा आणि शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील. याबाबत संस्थेच्या अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(७) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(८) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत मूळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

(९) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर आहे, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(१०) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २८/०८/२०१५ नुसार विहित केलेल्या संच मान्यतेच्या सुधारित निकषानुसार व याबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशांनुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहतील व त्यापेक्षा जास्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहणार नाहीत हे संस्थेस बंधनकारक राहील. तसेच अनुज्ञेय पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून समायोजनाने भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

(११) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(२), (३), (५) व (६) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१६४१२४७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.08.14 16:43:29 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, मल्टीपर्पज हायस्कूल आवार, गट साधना केंद्र इमारत गांधी चौक, लातूर- ४३१ ५१२.
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद, उस्मानाबाद
४) अध्यक्ष/ सचिव, श्री शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी, जि.सोलापूर.
५) निवडनस्ती ( एसएम-१).